वन विभागाची पुनर्रचना - प्रधान मुख्य वनसंरक्षक कार्यालयासाठी नवीन पदांची निर्मिती या योजनेत्तर योजनेतील पदांना सन २०२२-२३ करीता मुदतवाढ देणेबाबत.

महाराष्ट्र शासन

महसूल व वन विभाग,

शासन निर्णय क्रमांक: एफडीएम २०२२/प्र.क्र.१६/फ-२

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,

दिनांक :- २१ मार्च, २०२२

वाचावे :-

१) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र. एमएफएस-२०१७/प्र.क्र.७७/फ-८, दि.१३.०९.२०१९ व दि.२१.०९.२०२१.

२) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक- एफडीएम २०२१/प्र.क्र.२३/फ-२ दि. ३०/०९/२०२१

३) उप वनसंरक्षक, (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), नागपूर यांचे पत्र क्र.जा.क्र. कक्ष-३/ योजनेत्तर/प्र.क्र.१४ (२१-२२)/२९९, दि.२१/०२/२०२२

४) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.पदनि २०१६/प्र.क्र.०८/१६/आ.पु.क., दि.२२/०२/२०२२

**शासन निर्णय :-**

वन विभागाची पुनर्रचना-प्रधान मुख्य वनसंरक्षक कार्यालयासाठी नवीन पदांची निर्मिती या योजनेत्तर योजनेतील ५ अस्थायी पदांना सन २०२१-२२ मध्ये दिनांक ०१/०९/२०२१ ते २८/०२/२०२२ पर्यंत चालू ठेवण्यास संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये शासनाची मंजूरी देण्यात आली होती. सदर पदांची मुदत दि.२८/०२/२०२२ रोजी संपुष्टात आली आहे. तसेच महसूल व वन विभागाने संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयान्वये निश्चित केलेल्या आकृतीबंधात या अस्थायी पदाचा समावेश आहे. त्याअनुषंगाने खालील विवरणपत्रातील ५ अस्थायी पदास वित्त विभागाच्या संदर्भ क्र.४ येथील शासन निर्णय दि.२२/०२/२०२२ च्या अधिन राहून दि.०१/०३/२०२२ ते ३१/०८/२०२२ पर्यंत चालू ठेवण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे

| अ.क्र. | पदनाम | पदसंख्या |
|---|---|---|
| १ | प्रधान मुख्य वनसंरक्षक (माहिती, तंत्रज्ञान व धोरण) | १ |
| २ | अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (संरक्षण) | १ |
| ३ | मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) | १ |
| ४ | स्वीय सहायक | २ |
| | **एकूण** | **५** |

२. याबाबत वेतनासाठी होणारा खर्च -प्रधान शीर्ष २४०६ वनीकरण व वन्यजीवन (योजनेत्तर) ०१ वनीकरण, ००१ संचालन व प्रशासन (०१) (०१) मुख्य वनसंरक्षक (२४०६ ००२२) ०१ वेतन या लेखाशीर्षाखाली दर्शविण्यात यावा व सन २०२२-२३ या वर्षाकरीता मंजूर होणाऱ्या अनुदानातून भागविण्यात यावा.

३. प्रस्तुत शासन निर्णय हा वित्त विभागाच्या शासन निर्णय वित्त विभाग, क्र.पदनि-२०१६/ प्र.क्र.०८/१६/आ.पु.क., दि.२२/०२/२०२२ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३२११४४४०१८०१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

SUNIL PANDURANG PANDHARE

Digitally signed by SUNIL PANDURANG PANDHARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7f874792415b92ba519384cacb41b53a89cf93dbd96d4be1f7d97fb6326eed47, pseudonym=E356063E1710100620E953749C8FA6F85E9A154E, serialNumber=8B7DC58E83C9774E4419A7AEEAC77EAE7CDEA272D759DFB29451BCFE7E3F04C9, cn=SUNIL PANDURANG PANDHARE
Date: 2022.03.21 14:46:03 +05'30'

**(सुनिल पांढरे)**
**उप सचिव (वने)**
**महसूल व वन विभाग**

**प्रतिलिपी** :-

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२) प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३) अप्पर प्रधान मुख्य वनसंरक्षक (सर्व)
४) महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता)/ लेखा परिक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५) महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता) / लेखा परिक्षा), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
६) जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर
७) वित्त विभाग, व्यय १०/अर्थसं-४/ मंत्रालय, मुंबई
८) नियोजन विभाग (१४७५), मंत्रालय, मुंबई
९) वन विभागातील सर्व कार्यासने, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
१०) कार्यासन अधिकारी, ब-१ महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
११) निवडनस्ती, फ-२ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.